**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतन बाबीकरिता सन २०१८-१९या आर्थिक वर्षातील माहे फेब्रुवारी, २०१९ ते मार्च, २०१९ या दोन महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-राअआ-२०१८/प्र.क्र.५६/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २१ फेब्रुवारी, २०१९.

**वाचा :-**

(१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दि. ०२ एप्रिल, २०१८.
(२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.राअआ-२०१८/प्र.क्र. ५६ /का-९, दि. ५ मे, २०१८.
(३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्र.राअआ-२०१८/प्र.क्र. ५६ /का-९, दि. १६ ऑक्टोबर, २०१८.
(४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दि. २५ जानेवारी, २०१९.
(५) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.१/का-४/२०१८-१९ दि. ०४/०२/२०१९ चे पत्र व सहपत्र.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयास सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात "वेतन" या बाबीकरिता संदर्भ क्र.२ च्या दिनांक ०५.०५.२०१८ अन्वये माहे एप्रिल, २०१८ ते जुलै, २०१८ या चार महिन्यांचा तर संदर्भ क्र.३ च्या दिनांक १६.१०.२०१८ च्या शासन निर्णयान्वये, माहे ऑक्टोबर ते डिसेंबर, २०१८ या तीन महिन्यांचा खर्च भागविण्याकरिता निधी वितरीत करण्यात आला आहे. आता, संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी मागणी केल्यानुसार माहे फेब्रुवारी,२०१९ ते जानेवारी,२०१९ या दोन महिन्यांकरिता महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयाच्या वेतनाकरिता अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०१८-१९या आर्थिक वर्षामध्ये "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६ सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षांतर्गत एकूण रु.७०,००,०००/- (अक्षरी रूपये सत्तर लक्ष फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. उपरोक्त संदर्भ क्र. (१) येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये सन २०१८-१९ च्या प्रथम नऊमाहीकरिता (डिसेंबर,२०१८अखेर) अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत सदर (बीम्स) प्रणालीद्वारे मंत्रालयीन विभागांना अनुदान वितरित करण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी प्रथम नऊमाहीकरिता (डिसेंबर,२०१८अखेर) ७०% प्रमाणे रू.४९,००,०००/- (अक्षरी रूपये एकोण पन्नास लक्ष फक्त) पैकी संदर्भ

क्र. (२) च्या शासन निर्णयान्वये वेतन या बाबीकरिता माहे एप्रिल, २०१८ ते जुलै, २०१८ या चार महिन्यांकरिता एकूण रु.२१,७७,७७६/- (अक्षरी रूपये एकवीस लक्ष सत्त्याहत्तर हजार सातशे शहात्तर फक्त) व संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये, माहे ऑक्टोबर ते डिसेंबर, २०१८ या तीन महिन्यांकरीता रु.१६,३३,३३२/- असे एकूण रु.३८,११,१०८/- एवढे वेतन अनुदान वितरीत करण्यात आलेले आहे.

३. सदर वितरीत निधीपैकी खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आयोगाने सादर करुन माहे फेब्रुवारी, २०१९ ते मार्च, २०१९ या दोन महिन्यांकरीता वेतन अनुदानाची मागणी केली आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक दिनांक ०२.०४.२०१८ अन्वये, एकूण अर्थसंकल्पीत निधीच्या ७०% मर्यादेत अनुदान वितरीत करण्यास परवानगी देण्यात आली होती. तथापि, आता संदर्भ क्रमांक ४ च्या दिनांक २५.०१.२०१९ च्या वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये सदर मर्यादा ७०% वरुन ८०% करण्यात आलेली आहे. त्यानुसार आता मूळ रु.७०,००,०००/- तरतूदीपैकी रु.५६,००,०००/- तरतूद वितरणाकरीता उपलब्ध आहे. त्यापैकी संदर्भ क्र.२ व ३ च्या शासन निर्णयान्वये, एकूण रु.३८,११,१०८/- एवढा निधी वितरीत करण्यात आलेला आहे. उर्वरित रु.१७,८८,८९२/- (अक्षरी रुपये सतरा लक्ष अठ्ठयांऐंशी हजार आठशे ब्याण्णव फक्त) इतक्या निधीचे जानेवारी, २०१९ ते मार्च, २०१९ याप्रमाणे मासिक समान भाग केले असता, रु.५,९६,२९७/- प्रतिमास निधी वितरणास उपलब्ध आहे. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या वेतनाच्या बाबीकरीता त्यांनी मागणी केल्याप्रमाणे माहे फेब्रुवारी, २०१९ ते माहे मार्च, २०१९ या दोन महिन्याकरीता **(रु.५,९६,२९७.३३ X २ = रु.११,९२,५९४.६६) एकूण रु.११,९२,५९४.६६ एकूण अक्षरी रूपये अकरा लक्ष ब्याण्णव हजार पाचशे चौऱ्यांण्णव फक्त )** इतके अनुदान, ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाखाली खालील दर्शविल्याप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

| "२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | तपशीलवार लेखाशीर्ष | सन २०१८-१९ साठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान (रु.) | अखेरच्या तीनमाही साठी वितरित अनुदान (८०%) ( माहे जानेवारी, २०१९ ते मार्च, २०१९) (मूळ तरतुदीप्रमाणे) (रु.) | माहे डिसेंबर २०१८ अखेरपर्यंत वितरीत अनुदान (रु.) | माहे फेब्रुवारी २०१९ ते मार्च, २०१९ करिता मंजूर अनुदान (प्रतिमाह ) (रु.) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ३६,सहायक अनुदाने (वेतन) | ७०,००,०००/- | ५६,००,०००/- | ३८,११,१०८/- | ५,९६,२९७.३३ X २ = रु.११,९२,५९४.६६ |
| | **एकूण** | **७०,००,०००/-** | **५६,००,०००/-** | **३८,११,१०८/-** | **रु.११,९२,५९५/-** |
| एकूण ( अक्षरी रूपये अकरा लक्ष ब्याण्णव हजार पाचशे पंच्याण्णव फक्त) | | | | | |

४. सदर तरतुद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता, ते आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०१८-१९च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आपल्या कार्यालयाच्या खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी. **या आदेशान्वये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात आणि सन २०१८-१९ मधील माहे एप्रिल, २०१८ ते डिसेंबर, २०१८ मध्ये वितरीत करण्यात आलेल्या निधीमधून केलेल्या खर्चाचे तपशीलवार माहिती आणि विहीत नमुन्यात उपयोगिता प्रमाणपत्रे (utilization Certificate) (खर्च केलेल्या बाबींची संपूर्ण माहितीसह ) स्वतंत्रपणे तात्काळ शासनास सादर करण्यात यावी**. तसेच ज्या विवक्षीत प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात येतो, केवळ त्याच प्रयोजनासाठी निधी खर्च टाकणे अनिवार्य आहे. संदर्भ क्र. (१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

५. उपरोक्त रक्कम "मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

६. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल,२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२ एप्रिल,२०१८ मधील अटींची पुर्तता होत असून, प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे."

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेता २०१९०२२११६२०५०४४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2fde30534317da1ea9bdb3e7bec3c1084d5d608a86e993f8ac0fa02331b77751, serialNumber=b469b3fd61b5201f03b702c0f7fd0ec5cf18beb12425455f4856f44e3d4da763, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2019.02.21 16:22:50 +05'30'

**( सं.छ.तडवी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. निवडनस्ती (कार्यासन-९).